आरे दुग्ध वसाहत, गोरेगांव येथील सार्वजनिक वापरात नसलेला रस्ता ब्रेक टेस्ट ट्रॅकसाठी उपप्रादेशिक परिवहन कार्यालय, बोरीवली यांना मासिक भाडेपट्टीवर घेण्यास, करारानामा करण्यास व त्यापोटी होणाऱ्या खर्चास प्रशासकीय मंजूरी देणेबाबत...

## महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-१११८/प्र.क्र.२३७/परि-४

**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक: ०७ डिसेंबर २०१८

**वाचा :**

१) उपसचिव, कृषि व पदुम विभागाचे क्र. एएमसी २०१७/प्र. क्र. ६६/पदुम-१०, दि.५.११.२०१८ रोजीचे पत्र.

२) परिवहन आयुक्त कार्यालयाचे क्र. ब्रेचाप (४७)/१२१६/न. क्र. ४५/का.१०/(१) /जा. क्र. १५७३६, दि.१२.११.२०१८ रोजीचे पत्र.

३) उपअभियंता, कृषि बांधकाम उपविभाग-क्र.१, आरे, गोरेगांव (पूर्व), मुंबई-६५ यांचे क्र. कृबांउपवि-१/आरे/वलि/९११, दि.६.११.२०१८ रोजीचे पत्र.

४) सामान्य प्रशासन विभगाचा शासन निर्णय क्र. शाकाजा-१५९७/प्र. क्र. १०५/९७/२२, दि.१६.१०.२००३.

**प्रस्तावना :**

उपप्रादेशिक परिवहन कार्यालय, बोरीवली या कार्यालयास ब्रेक टेस्ट ट्रॅकसाठी कृषि व पदुम विभागाच्या संदर्भाधीन क्र. १ वरील, दि.५.११.२०१८ रोजीच्या पत्रान्वये, आरे दुग्ध वसाहतीमधील तात्पुरत्या स्वरुपात भाडेतत्वावर उपलब्ध करुन दिलेल्या रस्त्याचे मासिक भाडे निश्चिती करुन भाडेकरार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

उपप्रादेशिक परिवहन कार्यालय, बोरीवली या कार्यालयास ब्रेक टेस्ट ट्रॅकसाठी, आरे दुग्ध वसाहतीमधील युनिट क्र. १४ मधील सार्वजनिक वापरात नसलेला ४५० x५ मी. लांबीचा क्रॉक्रीटचा रस्ता व रस्त्याच्या दोन्ही बाजुंची ०.७५ मी. रुंदीची बाजूपट्टी अशी एकूण ४५०x६.५ मी रस्त्यापैकी २५०x६ मी. रस्ता भाडेतत्वावर उपलब्ध करुन दिलेला आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्र. ४ वरील दि.१६.१०.२००३ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेवून, प्रस्तुत रस्त्यासाठी सेवाभावी संस्था व राजकीय पक्ष यांच्याकरीता आकारण्यात येणाऱ्या रु. ५/- प्रति चौ. फूट प्रति माह या दराने (सन २०१८ करीता रु. १०.३९/-) व त्यामध्ये दरवर्षी ५% दरवाढ करण्यास आणि त्यापोटी येणाऱ्या रु. १,६७,६९४.६०/- मासिक व रु. २०,१२,३३५,२०/- वार्षिक खर्चास तसेच यासंदर्भात आवश्यक तो करारनामा करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च हा "मागणी क्र. बी-३, २०४१ वाहनांवरील कर (०२) (०१) प्रादेशिक कार्यालय (दत्तमत) (अनिर्वाय) (२०४१ ००३६), १४ भाडेपट्टी व कर" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येईल.

४. वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, दि.१७.४.२०१५ (सुधारीत) मधील वित्तीय नियम भाग-पहिला, उपविभाग-एक मधील अनुक्रमांक १०, नियम क्र. ११५ आणि महाराष्ट्र आकस्मिकता खर्च नियम १९६५ मधील नियम १४७ (क) मधील टीप-१ अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२०७१७४२३२५६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df7492703428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2018.12.07 17:49:22 +05'30'

**(द. ह. कदम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. महालेखापाल (लेखापरीक्षक)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. उप सचिव, कृषि व पदुम (पदुम-१०), मंत्रालय, मुंबई.
७. उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

८. उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, आरे दुग्धवसाहत, गोरेगांव (पू), मुंबई ६५
१०.परिवहन उप आयुक्त (प्रशासन/संगणक/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३.उपप्रादेशिक परिवहन अधिकारी, बोरीवली
१४.अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.निवड नस्ती (परिवहन-४)